सुशिक्षित बेरोजगारांना अर्थसहाय्य या योजने अंतर्गत तीन वर्षे अंशकालीन काम केलेल्या पदवीधर/पदविकाधारक उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेतील नियुक्त्यामध्ये उच्च वयोमर्यादेत शिथिलता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्र.पअंक-१००४/प्र.क्र.६/०४/१६-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१ फेब्रुवारी,२००४.

संदर्भ : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.१९.३.९८
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.पअंक-१००१/७२४/प्र.क्र.५४/०१/१६-अ, दि. १७ सप्टेंबर, २००१.

**प्रस्तावना :-**

"सुशिक्षित बेरोजगारांना अर्थसहाय्य" या योजने अंतर्गत तीन वर्षे अंशकालीन काम केलेल्या पदवीधर/पदविकाधारक उमेदवारांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय सेवेतील नियुक्त्यांमध्ये सन १९९१ च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचाऱ्यांनंतर पसंतीक्रम देण्यात आला असून उच्चतम वयोमर्यादेत ३ वर्षांपर्यंत शिथिलता देण्यात आली होती. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये ही शिथिलता रोजगार व स्वयंरोजगार विभागाकडे असलेल्या सदर उमेदवारांच्या यादीमधील ४२११ उमेदवारांपुरती ४५ वर्षांपर्यंत देण्यात आली होती. तथापि ही सवलत देण्यामागील उद्देश सदर योजने अंतर्गत शासकीय कार्यालयांमध्ये सतत ३ वर्ष काम केलेल्या व रोजगार व मार्गदर्शन केंद्रांमध्ये या अनुभवाची नोंद केलेल्या उमेदवारांना लाभ मिळावा हा होता. तसेच यामधील काही उमेदवारांचा समावेश सदर यादीमध्ये होऊ शकला नाही, असे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले होते. हे विचारात घेऊन ही सवलत उमेदवारांच्या संख्येवर अवलंबून न ठेवता, दिनांक १८ जानेवारी २००० पर्यंत ज्या उमेदवारांनी तीन वर्षांच्या अनुभवाची नोंद केली आहे, अशा सर्व उमेदवारांना देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

सुशिक्षित बेरोजगारांना अर्थसहाय्य या योजने अंतर्गत शासकीय कार्यालयांमध्ये तीन वर्षे अंशकालीन काम केलेल्या व रोजगार व मार्गदर्शन केंद्रांमध्ये या अनुभवाची नोंद केलेल्या पदवीधर/पदविकाधारक उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेतील नियुक्त्यामध्ये संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये उच्च वयोमर्यादेत ४५ वर्षांपर्यंत शिथिलता देण्याची सवलत यासंबंधातील यादीमधील ४२११ उमेदवारांपुरती मर्यादित न ठेवता दि.१८.१.२००० पर्यंत तीन वर्षांच्या अनुभवाची नोंद केलेल्या सर्व उमेदवारांना देण्यात यावी.

२. या सवलती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क च्या पदावरील सरळ सेवा भरतीसाठी लागू राहतील. ज्या प्रकरणी नियुक्तीची कार्यवाही चालू असेल त्या प्रकरणी हे आदेश लागू होणार नाहीत. हे आदेश या आदेशाच्या दिनांकापासून लागू राहतील.

रोटा प्रिंट/एच-1122(4000-3-04)1

(कृ.मा.प.

३. हे आदेश शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे /महामंडळे, नगरपालिका/ महानगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे, अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांना लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(द.दा.देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
उप सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,मुंबई-४०० ०३२.
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख, सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

*पत्राने.

------------